ॐ श्रीगणेशाय नमः । आदिशक्ति म्हणे अन्य देवींप्रत । देवेश आतुर सैन्य पाहत । अपार नाना शस्त्रे युक्त । तैं ते गेले गणेशाजवळीं ।।१।। देवेश म्हणती तयाप्रत । आला असे कामासुर साक्षात । महाबळ तो त्याच्या पुढ्यांत । देव वाटती मशकासम ।।२।। ज्याचें शस्त्रबळ अमोघ असत । कोणी त्याच्या सम न जगांत । तैसा कामासुर अद्वितीय उद्यत । वध करण्या देवांचा ।।३।। आतां कामासुरें संत्रस्त । आम्हीं जाहलों देव समस्त । रक्षण करी आमुचें सांप्रत । अन्यथा संकट अटळ असे ।।४।। तूं जरी आम्हां न राखशील । तो कामासुर येथ वधील । देवर्षीसी निश्चित या वेळ । विकटा तूं गणेशा ।।५।। त्यांचें तें ऐकून भयभीत वचन । गजानन देई आश्वासन । भय बाळगू नका उन्मन । प्राज्ञांनो महासुरास वधिन मीं ।।६।। माझ्या अनुग्रहें समर्थ समस्त । व्हाल यांत संशय नसत । दानवांसह लढा निश्चित । संरक्षण तुमचें करिन मीं ।।७।। विकटाचें ऐकून वचन । देव झाले मनीं प्रसन्न । गर्जना करिती भय सोडून । शक्तींनो ते शस्त्रधारी ।।८।। त्यांच्या गर्जनाशब्दें व्याप्त । दिगंतर तेव्हां होत । दैत्य जाहले भयभीत । जे आले होते रणांगणीं ।।९।।

परी धीर धरून मानसांत । क्रोधावेशें दैत्येश गर्जत । बळिमुख्य सिंहनाद करित । शंखनादही त्यासमयीं ।।१०।। दैत्यगण तदनंतर सोडित । शस्त्रवृष्टि मेघासम अविरत । पर्वत वृष्टिधारांनी मेघ ताडित । तैसे देवांवरी बाणांनी ।।११।। देव आपल्या शस्त्रांनी निवारिती । असुरांची शस्त्रे लावून शक्ती । दैत्य देव महा उग्र ते लढती । परस्परांशी त्या वेळीं ।।१२।। कोण आपुला कोण पर । याचाही बोध न होय सुरासुर । लढतां उडाली धूळ अपार । तेणें सूर्य झाकळला ।।१३।। देवासुर परस्परांशी वधिती । वापरून शस्त्रास्त्रें अति शक्ति । मर्मभेदी घाव घालिती । रक्ताची नदी वाहत होती ।।१४।। ती रक्तनदी वेगानें वाहत। त्यांत धूळ बसूनही शांत । ऐसें एक दिवस युद्ध अत्यंत । महाघोर चाले अहोरात्र ।।१५।। देव आणि दैत्य लढत । परस्पर जयोद्यत । देवांचा नंतर जय होत । दैत्य मुख्यांस वधिती ते ।।१६।। दैत्य मुख्य पळून गेले । तें पाहून कामास आश्चर्य वाटलें । दैत्येंद्र क्रोधें जळू लागले । बळि मुख्य उतरले रणमंडपीं ।।१७।। त्यांनी शस्त्रास्त्रबळें वधिले । देवांचें सैन्य जर्जर केलें । अमरसंघ तैं पळाले । भयभीत होऊन दशदिशांत ।।१८।। तदनंतर इंद्र रणांगणांत । धैर्यशाली लढण्या येत । कोपप्रभावें तो वधित । बळि असुरासी वज्राघातें ।।१९।। देव तेव्हां हर्षयुक्त । घनघोर गर्जना करित । कुंभकर्ण हाणी महेंद्रा त्वरित । हृदयावरी मुष्टिघातें ।।२०।। इंद्र भूतलावर पडला । मुष्टिघातें त्या मूर्च्छित झाला । महाबळ विष्णु सरसावला । रणभूमींत त्या वेळीं ।।२१।। सुदर्शन चक्र त्यानें सोडिलें । त्याच्या तीक्ष्ण धारेनें वधिलें । असंख्य दैत्य तेव्हां केलें । रावणें तेथें आगमन ।।२२।। क्रोधरक्त तो रणोद्यत । गदेनें विष्णू त्यास हाणित । त्यायोगें तो होत मूर्च्छित । कुंभकर्णासही ताडिलें त्यानें ।।२३।। त्या समयीं दुर्मदक असुर धावत । शंकासुरही

सहाय्या येत । महाविष्णूस मारण्या जात । केशव व्याकुळ तेधवां ।।२४।। शंकर स्वत: त्रिशूलधर । वेगें गेला उग्ररूपधर । सूर्यदेवही सत्वर । रणांगणीं उतरला ।।२५।। भानूने करून गदाघात । दुर्मद असुर पाडिला मूर्च्छित । तो मुखांतून रक्त ओकित । रणभूमीवरी असहाय ।।२६।। शंकर त्रिशूलानें मारित । शंकासुरासी पाडवित । धरापृष्ठीं तो मूर्च्छित । विष्णूसही उत्साह चढला ।।२७।। तदनंतर तो चक्र सोडित। महिष असुरा करी मूर्च्छित । दैत्य दानव सारे पळत । शुक्राचार्यास शरण जाती ।।२८।। देवांचा जय होत । असुर धारातीर्थी मृत । तें पाहून दैत्यमुख्यांस जीवित । करी प्रयत्नें शुक्रमुनी ।।२९।। तेवढ्यांत महाकाली तेथ येत । त्या शुक्राचार्यास धरून नेत । गुहेमध्यें बंदिस्त करित । संजीवन असुरांचें बंद झालें ।।३०।। तदनंतर कामासुर शोकयुक्त । दैत्य निश्वास सोडी प्रतापवंत । परी धैर्य धरून लढण्या निघत । स्वयें देवांविरुद्ध ।।३१।। ताता तुम्हीं थांबा सदनांत । आम्हीं तुमचे उभय सुत । जाऊं सत्वर रणांगणांत। मारूं महारिपू विघ्नपा नि:संदेह ।।३२।। ऐसें बोलून ते उभय सुत। महावीर रणस्थळीं जात। शंकर विष्णु देवांसी तेथ म्हणत । उत्कट क्रोधें त्या वेळीं ।।३३।। शोषण म्हणे महादेवाप्रत । थांब दुष्टा पहा सांप्रत । माझें अपूर्व पौरुष जगांत। ठार मारीन मीं तुजला ।।३४।। दैत्यगणांस तूं मारिलें । त्याचें प्रायश्चित्त पाहिजे घेतलें । शिव असशी तूं तुजला शोभलें । अरण्यरुदन शिवेसमान ।।३५।। वृद्ध कोल्हीण रानांत । जैसी आनंदे राहत । तैसा पशुतुल्य तूं वनांत । राहण्या योग्य सर्वथा ।।३६।। ऐसें जरी न करशील । माझ्या हस्तें मरशील। श्रीशंकर ऐकून वचन तें दुर्बल । म्हणती त्या शोषणासुरासी ।।३७।। अरे तूं कैसा सामर्थ्ययुत । तें पाहीन मीं त्वरित । दाखव आपुलें पौरुष

समस्त । विकटाहुनी विकट मीं ।।३८।। हें ऐकतां महाबाहू सोडित। बाण भयंकर देवांवरी क्रोध युक्त । देवगण पडले मूर्च्छित । शंकर त्वेषें लढतसे ।।३९।। तो असुर करी शरसंधान । शंकरावरी करी दुर्मन । शंकरें त्रिशूलाघात करून । शोषणास रणीं पाडियलें ।।४०।। परी क्षणभरांत सावध होऊन । शंभूस कोपानें धरून । महापर्वती गरगरा फिरवून । शिखरीं फेकले तयासी ।।४१।। तेव्हां हर्षभरें जयजयकार। दैत्य करिती समग्र । विष्णूजवळीं जात दुष्पूर असुर । रागावून म्हणे सुरेश्वरासी ।।४२।। तो महाबाहू अत्यंत गर्वित । म्हणे विष्णू तूं मदमत्त। मज न जाणसी दुर्वृत्त । दुर्मती तूं दुष्ट अससी ।।४३।। तूं महावीर दैत्यनायक। रणांत मारिलेस असंख्य । आतां त्याचें फळ नि:शंक। भोग आतां माझ्या करीं ।।४४।। देवानुयायांचा साहाय्य अससी । आतां माझ्या हस्तें यमगृहा जासी । त्याचें तें वचन ऐकून तयासी । केशव म्हणे क्रोधानें ।।४५।। त्या दैत्यपुत्रासी गर्वयुक्तासी । श्रीविष्णु म्हणे महावीरासी । तूं काय हें अघटित वदसी । पाप्या तुज मीं ठार करीन ।।४६।। कामासुराच्या पाठिंब्यानें चित्तांत । दैत्यजा गर्व नको धरूं उन्मत्त। ऐसें बजावून विष्णु हाणित । गदेनें त्या दुष्पूरासी ।।४७।। त्या गदाघातें अति विह्वल । तो दुष्पूर दैत्य पडला खल । धरणीतळावरी तात्काळ । शुद्ध हरपली तयाची ।।४८।। नंतर शस्त्रवृष्टि सुरवर । करिती त्या असुरावर । तोही सावध होऊन तयांवर । बाण सोडी त्वेषानें ।।४९।। शंभर बाण सूर्यावर सोडित । बाणशतें इंद्रास ताडित । तैशाच बाणें व्याकुळ करित । यम वायू ब्रह्मासी ।।५०।। तेव्हां सावधान राहून। विष्णूनें चक्र सोडून । त्या दुष्पूरासुरा विद्ध करून । मूर्च्छित केलें रणभूवरी ।।५१।। परी पुनरपि जाग येऊन । तो विष्णूस करी ताडन । हजारों बाण सोडून । अति त्वेषानें तयावरी ।।५२।। ऐसें

भयंकर कर्म करित । दुष्पूर तैसा शोषण बळवंत । शक्तींनो तेव्हां जयप्रभाव युत । दैत्येंद्र स्तविती त्या नेत्यांसी ।।५३।। ते दैत्यराजाचे दोन सुत । रणांगणीं शौर्य गाजवित । बळिमुख्य दैत्येंद्र प्रमुदित । प्रशंसिती म्हणोनी ।।५४।। तदनंतर देवगणास मारण्या धावती । तेव्हां क्रुद्ध झाले गणपति । द्विरदानन तो पाश सोडिती । अंकुश ही फेकिती गजानन ।।५५।। गजाननाचा पाश कंठांत । शोषणाच्या गुंडाळत । श्वास कोंडून तो पडत । रणांगणांत बेशुद्ध ।।५६।। हात पाय आपटित । तत्क्षणीं झाला मृत । अंकुश सहसा उदरांत । घुसला दुष्पूर असुराच्या ।।५७।। तो दुष्पूरही दैत्यराक्षसांसमोर । मरून पडला अति उग्र । तदनंतर पाश अंकुश रणमंडळावर । हाहाःकार उडविती ।।५८।। गजाननाची शस्त्रें संचार करिती । अनेक दैत्यांसी वधिती । बळिमुख्य दानव तैं पळून जाती । लाज सारी सोडून ।।५९।। शस्त्रहीन ते दशदिशांत। जेव्हां पळाले भयभीत । तेव्हां पाशांकुश पुनरपि परतत । गणेशाच्या हातांत ।।६०।। ते पाहून अमरगण । उठला पुनरपि आनंदून। बळसंपन्न होऊन । दुःख विसरला क्षणांत ।।६१।। ते देव समस्त स्तविती । विकट देवासी अतिप्रीतीं । दैत्य शोकाकुल करिती । रुदन दाही दिशांत ।।६२।। अद्यापि कामासुर रणांत । आला नव्हता बळवंत। त्याचे वर्णन पुढिल अध्यायांत । अति सुरस वाचावें ।।६३।। ओमिति श्रीमदान्त्ये पुराणोपनिषदि श्रीमन्मौद्गले महापुराणे षष्ठे खंडे विकटचरिते कामासुरपुत्रवधो नाम त्रयस्त्रिंशत्तमोऽध्याय: समाप्त: । श्रीगजाननार्पणमस्तु।

(अध्याय तेहतिसांवा संपूर्ण)